विभागीय चौकशी पुर्ण करण्यासाठी
टप्पेनिहाय कालावधी निश्चित करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : वशिअ २०२५/प्र.क्र.३५/विचौ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०२५

**वाचा :** शासन परिपत्रक क्रमांक प्रविचौ २००८/ प्र.क्र.११/०८/११-अ दि.७ एप्रिल, २००८

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम १० व नियम ८ अन्वये सुरु करण्यात आलेल्या विभागीय चौकशीची प्रकरणे अनुक्रमे ३ व ६ महिन्यांत पूर्ण करावीत, अशा सर्वसाधारण सूचना उपरोक्त संदर्भाधिन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. तथापि, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ अन्वये सुरु करण्यात आलेल्या विभागीय चौकशीच्या अनुषंगाने प्राथमिक चौकशी करणे, ज्ञापन बजावणे, चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांची नेमणूक करणे, विभागीय चौकशीची कार्यवाही, चौकशी अहवालावरील कार्यवाही, शिक्षेच्या प्रस्तावास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता, तद्नंतर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे अभिप्राय / सल्ला व अंतिम शिक्षा बजाविणे हे टप्पे सहा महिन्यांमध्ये पूर्ण होऊ शकत नसल्याचे निदर्शनास आले आहे. तसेच एकत्रित कार्यवाही असल्यास सर्व अपचाऱ्यांची चौकशी करणे, साक्षीदारांची उलटतपासणी यात बराच कालावधी व्यतीत होतो.

२. वरील पार्श्वभूमीवर महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ नुसार करावयाच्या विभागीय चौकशीची प्रकरणे निकाली काढण्यासाठीचा कालावधी वाढविणे आवश्यक ठरते. यास्तव, खालीलप्रमाणे सुधारीत सुचना देण्यात येत आहेत :-

(१) महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम १० खालील विभागीय चौकशीची प्रकरणे विभागीय चौकशी मंजूर केल्यापासून ३ महिन्यांत पूर्ण करावी.

(२) ज्या अनियमिततेच्या प्रकरणात प्राथमिक चौकशी करावयाचा निर्णय घेण्यात आला असेल अशा प्रकरणांत दोन महिन्यांत अशी प्राथमिक चौकशी पूर्ण करावी. तसेच प्राथमिक चौकशीच्या अहवालाच्या अनुषंगाने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ अनुसार विभागीय चौकशी करावयाचे ठरविल्यास पुढील एक महिन्यात अपचाऱ्यावर दोषारोपाचे ज्ञापन जोडपत्रांसह बजाविण्यात यावे.

(३) **शासकीय सेवेतील गट अ व गट ब मधील अपचारी तसेच एकत्रित विभागीय चौकशी प्रकरणी, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ अन्वये चौकशी सुरु करण्याचा निर्णय झाल्यानंतर विभागीय चौकशीची कार्यवाही पूर्ण करण्यासाठी १८ महिने इतका कालावधी निश्चित करण्यात येत आहे.**

(४) सर्वसाधारण परिस्थितीत विभागीय चौकशी पुर्ण करण्यासाठी टप्पेनिहाय कालावधी खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | विभागीय चौकशीचा टप्पा | साधारण कालावधी |
|---|---|---|
| १. | दोषारोपपत्र तयार करणे व ते अपचारी कर्मचाऱ्यावर बजावणे. | तीन महिने |
| २. | अपचाऱ्याने दोषारोपावरील अभिवेदन सादर करणे. | १५ दिवस मुदतवाढीसह ४५ दिवस |
| ३. | अपचारी कर्मचाऱ्याच्या अभिवेदनावर निर्णय घेणे व चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांचे नियुक्ती आदेश व संबंधित कागदपत्रे सुपुर्त करणे | विहीत मुदतीत निवेदन प्राप्त झाल्यानंतर / अथवा निवेदन प्राप्त न झाल्यास १ महिना |
| ४. | चौकशी अधिकाऱ्याकडील कार्यवाही | कमाल ९ महिने<br>(वाजवी कारणाकरिता चौकशीस विलंब होत असल्यास मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.) |
| ५. | चौकशी अहवाल प्राप्त झाल्यानंतर शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने अहवालाची छाननी करुन निर्णय घेणे व शिस्तभंगविषयक प्राधिकारी चौकशी अधिकारी यांच्या अहवालाशी सहमत / असहमत असल्यास त्याच्या कारणांसह अहवालाची प्रत अपचाऱ्यावर बजावून त्यास निवेदन सादर करण्यास कळविणे. | १ महिना |
| ६. | चौकशी अहवालावर अपचाऱ्याने निवेदन सादर करावयाचा कालावधी | १५ दिवस |
| ७. | चौकशी अहवालावर अपचाऱ्याचे निवेदन प्राप्त झाल्यानंतर / विहित कालावधीनंतरही निवेदन प्राप्त न झाल्यास शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने अभिवेदनावर निर्णय घेऊन निष्कर्ष काढणे व अंतिम आदेश निर्गमित करणे.<br>**(गट-क व गट-ड मधील अपचारी)** | एक महिना |
| ८. | गट-अ आणि गट-ब मधील अपचाऱ्यांच्या अभिवेदनावर विचार करुन शिक्षा प्रस्तावास सक्षम प्राधिकाऱ्याची / आवश्यकतेनुसार सामान्य प्रशासन विभागाची सहमती प्राप्त करुन यथास्थिती महाराष्ट्र लोकसेवा आयोगास प्रस्ताव सादर करणे. | दोन महिने |
| ९. | आयोगाचा सल्ला प्राप्त झाल्यानंतर अंतिम आदेश निर्गमित करणे. | एक महिना |

३. विभागीय चौकशीची दोषारोपपत्रे अपचाऱ्यास बजाविण्यापासून अंतिम आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही वरीलप्रमाणे पूर्ण करण्याची दक्षता शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यांनी घ्यावी.

मात्र, विभागीय चौकशीतील एखाद्या टप्प्यावर निर्धारित केलेल्या कालावधीपेक्षा जास्त कालावधी लागल्यास त्याचा परिणाम म्हणून संबंधित विभागीय चौकशी रद्द करणे अथवा स्थगित करण्याची मागणी अपचाऱ्यास करता येणार नाही.

अपवादात्मक परिस्थितीत, वरीलप्रमाणे निश्चित केलेल्या कालावधीत विभागीय चौकशी पुर्ण होत नसल्याबाबत शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याची खात्री पटल्यास, विलंबाच्या वाजवी कारणांसह सक्षम प्राधिकरणाकडे मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

**४. विभागीय चौकशीच्या कोणत्याही टप्प्यावर गैरवाजवी अथवा हेतूपुरस्सर विलंब झाला आहे असे निदर्शनास आल्यास, संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करावी.**

५. यासोबतच विभागांतर्गत प्रलंबित असलेल्या चौकशी प्रकरणांचा निपटारा करण्यासाठी कार्यालय प्रमुख, विभाग प्रमुख/ प्रादेशिक विभाग प्रमुख आणि प्रशासकीय विभाग स्तरावरुन त्यांचा अधिनस्त कार्यालयातील विभागीय चौकशी प्रकरणांचा नियमितपणे आढावा घ्यावा.

६. उपरोक्त सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२५०६१०१५३४१२७००७ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E146A6DDC8FB6681D49A5099661D41639DA6C568419F071BB9CDFD8A2E08058C, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2025.06.10 15:35:38 +05'30'

**(सुचिता महाडिक)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव,विधान भवन, मुंबई

मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई

मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

मा.उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान भवन, मुंबई

मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान भवन, मुंबई

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री व राज्यमंत्री  यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायालय, मुंबई, औरंगाबाद, नागपूर
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
निवडनस्ती विचौ-१